**क्रमांक:**साजेलि-२००८/प्र.क्र.४३/०८/१४-अ,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक :** ६ डिसेंबर २०१०

.

**पहा:** शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: साजेलि-१०९८ /प्र.क्र.१७/९८/१४-अ, दिनांक : ५/१/२००१**,**

**आदेश**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२६.११.१९९० अन्वये लिपिक, लिपिक-टंकलेखक व टंकलेखक असा संयुक्त संवर्ग निर्माण करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला. संयुक्त संवर्ग स्वीकारल्यामुळे टंकलेखकांना त्यांच्या कनिष्ठांचे दि.३१.१२.९४ पूर्वीचे मानीव दिनांक मिळाले. त्यामुळे जे काही कर्मचारी दि.३१.१२.९४ पूर्वी गुणोत्तरात होते, त्यापैकी काही कर्मचारी गुणोत्तरबाहय झाले. यामुळे यापूर्वी अंतिम स्वरुपात प्रसिध्द केलेल्या सामायिक जेष्ठतासूचीत सुध्दा फेरबदल झाले. त्यामुळे त्यांची व नव्याने लिपिक-टंकलेखक संवर्गात समाविष्ट झालेल्या कर्मचाऱ्यांची जेष्ठता नव्याने निश्चित करण्यात आली. तद्नुसार खाली नमूद केलेल्या लिपिक, लिपिक-टंकलेखक व टंकलेखकांना सहायक पदावर नियमित पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ-३ मध्ये दर्शविलेल्या विभागात करण्यात येत आहे. तसेच सहायक पदावरील नियमित नियुक्तीचा दिनांक त्यांच्या नावासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविलेल्या प्रमाणे देण्यात येत आहे:-

| **अ. क्र.** | **लिपिक, लिपिक-टंकलेखक व टंकलेखकांची नांवे** | **पदोन्नतीनंतरचा विभाग** | **नियमित पदोन्नतीचा दिनांक** |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** |
| १ | श्री.ल.फ.अलुरकर (खुला) | वित्त विभाग | ०२.०९.१९९७ |
| २ | श्री.सु.ऊ.राठोड (वि.जा.-अ) | गृह विभाग | ३०.१२.१९९७ |
| ३ | श्री.अ.बा.बुधे (भ.ज.-क) | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | ०१.०२.१९९८ |

**२.** उपरोक्त पदोन्नत्या मा. उच्च न्यायालयातील मूळ याचिका क्र.८४५२/०४ व रिट याचिका क्र.९९/२०१० च्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून देण्यात येत आहेत.

**३.** ज्या लिपिक, लिपिक-टंकलेखक व टंकलेखकांनी जाती वैधता प्रमाणपत्र सादर केले नाही. अशांची नावे या आदेशात अंतर्भूत करण्यात आलेली नाहीत.

४. उपरोक्त पदोन्नत लिपिक, लिपिक-टंकलेखक व टंकलेखकांनी पदोन्नतीच्या पदावरील त्यांच्या वेतन निश्चितीचा विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत द्यावा. अशा प्रकारचा विकल्प न दिल्यास वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९९१ मधील ११ (१) (ए) खालील तरतूदीनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन केली जाईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
**(सु.मो.महाडिक)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),
संबंधित सहायक,
निवड नस्ती / सा.प्र.वि./१४-अ, सग्रंहार्थ .